**पशुसंवर्धन विभागाची ah.mahabms.com ही संगणक आज्ञावली, सन २०२४-२५ मध्ये कार्यान्वित ( लाईव्ह + क्लाऊड + SMS) करण्यासाठी विहित शासकीय पध्दतीचा अवलंब करुन बाहस्त्रोताद्वारे Averta Strategy Private Limited, Pune या संस्थेची निवड करण्यास व त्याकरीता येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०२४/ प्र.क्र.११७/पदुम १६**
मंत्रालय विस्तार, मुंबई ३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०२५

**संदर्भ -** १) सामान्य प्रशासन विभाग ( माहिती व तंत्रज्ञान) शासन निर्णय क्र.मातंस-१७१६/प्र.क्र.२८६/३९, दिनांक ०९/०८/२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग ( माहिती व तंत्रज्ञान) शासन निर्णय क्र.मातंस-१७१७/प्र.क्र.१११/३९, दिनांक २४/०३/२०१७
३) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र.एफवापी२४(२५)/आयटीहब/सीआर-५(२)/१५८५/ २०२४/पसं-६, दिनांक २२/०७/२०२४
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/ प्र.क्र.११७/पदुम १६, दि.१४/८/२०२४
५) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र.एफवापी २४(२५)/आयटीहब/सीआर-५/२०६५/ २०२४/पसं-६, दिनांक १७/१०/२०२४
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/ प्र.क्र.११७/पदुम १६, दि.१०/१२/२०२४
७) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र.एफवायपी२४(२५)/आयटीहब/सीआर-५/२२ २०२४/पसं-६, दिनांक ०३/०१/२०२५

**प्रस्तावना :-**

पशुसंवर्धन विभागाच्या वैयक्तिक लाभाच्या राज्यस्तरीय आणि जिल्हा वार्षिक योजना ऑनलाईन पद्धतीने राबविण्यासाठी ah.mahabms.com ही संगणक प्रणाली तयार करण्यात आली आहे. या प्रणालीद्वारे विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या वैयक्तिक लाभाच्या योजनांकरीता ऑनलाईन पद्धतीने लाभार्थ्यांची निवड केली जाते. सन २०२४-२५ मध्ये सदर ah.mahabms.com प्रणाली कार्यान्वित (लाईव्ह + क्लाऊड + SMS) करण्याकरीता विहित शासकीय पध्दतीचा अवलंब करुन बाहस्त्रोताद्वारे खाजगी संस्थेची निवड करण्यास संदर्भ क्र.६ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यासदर्भात आयुक्त पशुसंवर्धन यांच्या स्तरावर दि.१९/१२/२०२४ ते २५/१२/२०२४ या कालावधी दरम्यान दरपत्रके मागविण्यात आली होती. प्राप्त दरपत्रकांची बाबनिहाय पडताळणी करण्यासाठी मूल्यमापन समितीची ( Bid Evaluation Committee) दिनांक २६/१२/२०२४ रोजी आयोजित बैठकीत करण्यात आली होती. तपासणी दरम्यान सदर Averta Strategy Private Limited, Pune या संस्थेची व त्यांच्या रु.९,७९,८३७/- (GST सहित) दरास स्विकृत करण्याची शिफारस तांत्रिक पडताळणी आणि मूल्यमापन समितीमार्फत करण्यात आली आहे. त्यानुसार त्यास मंजूरी देण्याबाबत आयुक्त पशुसंवर्धन यांनी संदर्भ क्र.७ अन्वये विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेऊन पशुसंवर्धन विभागाची ah.mahabms.com ही संगणक आज्ञावली कार्यान्वित ( लाईव्ह + क्लाऊड + SMS ) करण्याकरीता येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय**

पशुसंवर्धन विभागाची ah.mahabms.com ही संगणक आज्ञावली कार्यान्वित (लाईव्ह + क्लाऊड + SMS ) करण्याकरीता बाहयस्त्रोताद्वारे संस्थेची निवड करण्याकरीता आयुक्त पशुसंवर्धन स्तरावर राबविण्यात आलेल्या विहित निवड प्रक्रियेनुसार Averta Strategy Private Limited, Pune या संस्थेची निवड करण्यास व त्याकरीता येणाऱ्या रु.९,७९,८३७/- (GST सहित) ( रुपये नऊ लाख एकोणऐंशी हजार आठशे सदतीस फक्त ) इतक्या खर्चास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीकरीता येणारा खर्च मागणी क्र.डी-७, ३४५१-सचिवालय आर्थिक सेवा, (०२)(०५) ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाची अंमलबजावणी ( पदुम ) ( ३४५१२९८९ ), १७-संगणक खर्च या अंतर्गत सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध होणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग -चार, अ.क्र. ११, अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३०७१४२६२४५८०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2025.03.07 14:28:01 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. प्रधान सचिव , माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
४.उप सचिव (पशुसंवर्धन), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ,
५.वित्त विभाग (व्यय-२ / अर्थसंकल्प १५) मंत्रालय, मुंबई ३२,
६. निवडनस्ती- पदुम-१६.